॥श्रीमद्भगवद्गीता॥

# ॥यथार्थ गीता॥

५२००

वर्षांच्या दीर्घ
कालानंतर
श्रीमद्भगवद् गीतेची
शाश्वत व्याख्या

॥श्रीमद्भगवद्गीता॥

॥यथार्थ गीता॥

मानव धर्मशास्त्र

स्वामी अड़गड़ानन्द

MARATHI

## लेखकाविषयी .....

'यथार्थ गीता' या पुस्तकाचे लेखक एक अशा प्रकारचे संत आहेत की त्यांच्या जवळ एकही शैक्षणिक पदवी नाही. पण सद्गुरुंची अपार कृपा त्यांना लाभलेली आहे. त्यामुळे त्यांची जीवनयात्रा ईश्वरीय आदेशानुसार चालू आहे. सुरुवातीस लेखकश्रींना लेखन म्हणजे भजन साधनातील अडथळा वाटे. परंतु या गीतेवरील भाष्याबाबत भगवंताची आज्ञा हीच निमित्तरुप झाली आहे. भगवंतानी त्यांना ध्याना मध्ये सांगितले की, आपल्या सर्व वृत्ती शांत झाल्या आहेत. फक्त एक गोष्ट बाकी राहिली आहे व ती म्हणजे गीतेवर भाष्य लिहिणे. सुरुवातीस भजनातच व्यस्त राहून ही गोष्ट टाळण्याचा त्यांनी प्रयत्न केला. परंतु भगवंताचा आदेश बदलला नाही. त्या आदेशाचे मूर्त-स्वरुप म्हणजेच 'यथार्थ गीता' हे भाष्य होय. हे भाष्य करताना जिथे जिथे त्रुटी राही तेथे भगवंत ती सुधारित असत. स्वामीजींनी स्वान्तः सुखाय लिहिलेली ही कृती सर्वान्तः सुखाय बनावी, हीच शुभकामना!

प्रकाशक

।। ॐ नमः सद् गुरुदेवाय ।।

# श्रीमद्भगवद्गीता

# यथार्थ गीता

## मानव धर्मशास्त्र


टीकाकार

**परमपुज्य श्री परमहंस महाराजांचा कृपाप्रसाद**

**स्वामी अड़गड़ानन्दजी**

**श्री परमहंस आश्रम शक्तेषगढ,**

गाव–पत्रालय–शक्तेषगढ़, जिल्हा – मीर्जापुर,

उत्तर प्रदेश, भारत

फोन : (०५४४३) २३८०४०



प्रकाशक

**श्री परमहंस स्वामी अड़गड़ानन्दजी आश्रम ट्रस्ट**

न्यू अपोलो एस्टेट, गाला नं 5, मोगरा लेन (रेलवे सबवे के पास), अंधेरी (पूर्व), मुम्बई – 400069

फोन - (022) 28255300 • ई-मेल - contact@yatharthgeeta.com • वेबसाइट - www.yatharthgeeta.com


ॐ

श्रीकृष्णाने ज्या वेळी गीतेचा उपदेश दिला होता, त्यावेळी त्यांच्या अंतरंगात कोणते भाव होते? मनातील समस्त भाव सांगितले जात नाहीत. फार थोडे सांगितले जातात. थोडे भावावेशात व्यक्त होतात आणि शेष क्रियात्मक असतात. म्हणजे एखादा साधक साधनमार्गावर चालूनच ते जाणू शकतो. ज्या एका स्तरावर श्रीकृष्ण होते, ती अवस्था प्राप्त करुन घेतलेले महापुरुषच गीता काय सांगते ते जाणतात. ते गीतेतल्या ओळींचा केवळ पुनरोच्चार करीत नाहीत तर त्यावेळी श्रीकृष्णांच्या मनातील भाव पण स्पष्टपणे दाखवू शकतात. कारण त्या वेळी श्रीकृष्णाच्या समोर जे दृश्य होते तेच दृश्य त्या वर्तमान महापुरुषांसमोर पण आहे. म्हणून असा महापुरुष ते पाहू शकतो, इतरांना दाखवू शकतो, तुमच्यात ते जागृत पण करु शकतो, त्या मार्गावर तुम्हाला यशस्वीपणे चालवूही शकतो.

'पूज्य श्री परमहंसजी महाराज' देखील त्या पातळीवरील महापुरुष होते. त्यांच्या वाणीद्वारे व अंत:प्रेरणेद्वारे गीतेचा जो अर्थ प्राप्त झाला त्याचे संकलन म्हणजे 'यथार्थ गीता' आहे.

स्वामी अड़गड़ानन्द

# आमची प्रकाशने

| पुस्तकें | भाषा |
| --- | --- |
| **यथार्थ गीता** | |
| ❖ भारतीय भाषा | हिंदी, मराठी, पंजाबी, गुजराती, उर्दू, संस्कृत, उडिया, बंगाली, तामिल, तेलगू, मलयाळम, कन्नड, आसामी |
| ❖ अन्तरराष्ट्रीय भाषा | इंग्रजी, जर्मन, फ्रेंच, नेपाली, स्पॅनीश, नार्वेजीयन, चायनीज, डच, इटालियन, रशियन |
| **शंका समाधान** | हिंदी, मराठी, गुजराती, इंग्रजी |
| **जीवनादर्श एवं आत्मानुभूति** | हिंदी, मराठी, गुजराती, इंग्रजी |
| **अंग क्यों फडकते हैं ? और क्या कहते हैं ?** | हिंदी, इंग्रजी, गुजराती, जर्मन |
| **अनछुये प्रश्न** | हिंदी, मराठी, गुजराती |
| **एकलव्य का अंगुठा** | हिंदी, मराठी, गुजराती |
| **भजन किसका करें** | हिंदी, मराठी, गुजराती, जर्मन, इंग्रजी |
| **योगशास्त्रीय प्राणायाम्** | हिंदी, मराठी, गुजराती |
| **षोडशोपचार पूजन-पद्धती** | हिन्दी, मराठी, गुजराती |
| **योगदर्शन-प्रत्यक्षानुभूत व्याख्या** | हिन्दी |
| **ग्लोरिस् ऑफ योगा** | इंग्रजी |
| **ऑडियो कैसेट्स** | |
| **यथार्थ गीता** | हिंदी, गुजराती, मराठी, इंग्रजी |
| **अमृतवाणी** | हिंदी |
| (श्री स्वामीजींच्या मुखारविन्दातून निःसृत अमृतवाणीचें संकलन) भाग १ से ५१ पर्यंत | |
| **गुरूवंदना ( आरती )** | |
| (MP3) सीडीज् | |
| **यथार्थ गीता** | हिंदी, गुजराती, मराठी, इंग्रजी |
| **अमृतवाणी** | हिंदी |
| **ऑडियोसीडीज्** | |
| **यथार्थ गीता** | जर्मन |

अनंत श्री विभूषित,

योगिराज, युग पितामह

**परमपुज्य श्री स्वामी परमानन्दजी**

**श्री परमहंस आश्रम अनुसुया**

(चित्रकुट)

यांच्यापरम पावन चरणी

सादर समर्पित

**- अन्तस्प्रेरणा**

# गुरु-वन्दना

**।। ॐ श्री सद्‌गुरुदेव भगवान् की जय ।।**

जय सद्‌गुरुदेवं, परमानन्दं, अमर शरीरं अविकारी।।
निर्गुण निर्मूलं, धरि स्थूलं, काटन शूलं भवभारी।।

सूरत निज सोहं, कलिमल खोहं, जनमन मोहन छविभारी।।
अमरापुर वासी, सब सुख राशी, सदा एकरस निर्विकारी।।

अनुभव गम्भीरा, मति के धीरा, अलख फकीरा अवतारी।।
योगी अद्वैष्टा, त्रिकाल द्रष्टा, केवल पद आनन्दकारी।।

चित्रकूटहिं आयो, अद्वैत लखायो, अनुसुइया आसन मारी।।
श्री परमहंस स्वामी, अन्तर्यामी, हैं बड़नामी संसारी।।

हंसन हितकारी, जग पगुधारी, गर्व प्रहारी उपकारी।।
सत्-पंथ चलायो, भरम मिटायो, रूप लखायो करतारी।।

यह शिष्य है तेरो, करत निहोरो, मोपर हेरो प्रणधारी।।
जय सद्‌गुरु.........भारी।।

।। ॐ ।।

"आत्मने मोक्षार्थं जगत् हिताय च"
श्री श्री १००८ श्री स्वामी परमानन्दजी महाराज ( परमहंसजी )
जन्मः शुभ सम्वत् विक्रम १९६९ ( १९११ ई. )
महाप्रयाण ज्येष्ठ शुक्ल ७, २०२६, दिनांक २३/०५/१९६९ ई.
परमहंस आश्रम अनुसुइया, चित्रकूट

श्री स्वामी अड़गड़ानन्द जी महाराज

C-121, KIRTI NAGAR, NEW DELHI - 110 015 (INDIA).

## विश्वगौरव सम्मानपत्र

वेदवेदांग आयुर्वेद ज्योतिषादि शास्त्रपरम्परासुरक्षाव्रती, अखिल संस्कृतवाङ्मयसंरक्षण—प्रचार—प्रसारपक्षधर आर्षसनातनमर्यादाजीवनपद्धतिसदाचारपरायण, "सर्वभूतहिते रतः—वसुधैव कुटुम्बकम्" के सद्भावना पर्यावरण से ओतप्रोत,

सम्माननीय श्री स्वामी अड़गड़ानन्द जी महाराज - परमहंस आश्रम

निवासी शक्तेशगढ़ चुनार (मिर्जापुर) को

अन्तर्राष्ट्रीय अधिवेशन में विश्वगौरव सम्मानपत्र से विभूषित किया जाता है।

एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः।
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः।

*World Religious Parliament is pleased to confer*
*The Title of Vishwagaurav*
*In recognition of his meritorious contribution for World Development*
*through* श्रीमद्भगवद्गीता, धर्मशास्त्र, (भाष्य यथार्थ गीता)
दिनांक कुम्भ मेला 10-4-98 हरिद्वार

*Chairman* (आचार्य)
*Presentation Committee*

*Acharya Prabhakar Mishra*
*Chairman*
*World Religious Parliament*

**विसाव्या शतकाच्या अंतिम महाकुंभ मेळ्याच्या पर्वामध्ये हरिद्वार येथील सर्व शंकाराचार्य, सर्व महामंडालेश्वर, ब्राह्मण महासभा आणि ४४ देशातील धर्मशील विव्दानांच्या उपस्थितीमध्ये विश्वधर्म संसदेद्वारा पूज्य स्वामीजींना ''विश्वगौरव'' हे सन्मानपत्र अर्पण करण्यात आले.**

# विश्व धर्म संसद्

## WORLD RELIGIOUS PARLIAMENT

C-121, KIRTI NAGAR, NEW DELHI 110 015 (INDIA)

### सम्मान प्रमाणपत्र

''शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्'' के मौलिक सिद्धान्तों पर आधारित विश्व में निरोगसमाज की स्थापना तथा शारीरिक मानसिक बौद्धिक सामाजिक स्वास्थ्य की उपलब्धि के लिए प्रयत्नशील एवं बाह्य तथा आन्तरिक पर्यावरण की स्वच्छता के लिए संकल्पित विश्व धर्मसंसद् प्राच्यअर्वाच्य ज्ञान विज्ञान की किसी भी शाखा के माध्यम से मानवता की सेवाओं में समर्पित व्यक्तियों को सम्मान करने में गौरव समझती है।

इसी धारणा-अवधारणा के दृष्टिकोण से उल्लेखनीय ज्ञान तथा सेवाओं के लिए श्री विश्वमानव को एक धर्मशास्त्र दाता विश्वगौरव स्वामी अड़गड़ानन्द जी को यथार्थ गीता धार्मिक क्षेत्र/विषय में विश्वगुरु सम्माननीय उपाधि से सम्मानित तथा जनसेवा के क्षेत्र में अग्रणी प्रमाणित करती है।

श्रीमद् भगवद् गीता भाष्य "यथार्थ गीता" धर्मशास्त्र है।

*World Religious Parliament is pleased to confer the above Title in recognition of his meritorious contribuiton for World Development through* ____________

26-1-2001

Chairman
Presentation Committee
or
Presiding Authority

Acharya Prabhakar Mishra
Chairman (Indian Region)
World Religious Parliament

**विंश्वमानव धर्मशास्त्र श्रीमद्‌भगवतगीता या महान ग्रंथावरील 'यथार्थ गीता' ह्या भाष्याबद्दल परमपूज्यस्वामी श्री अडगडानन्द महाराजांना दि. २६ जानेवारी २००१ रोजी महाकुंभ पर्व, प्रयाग येथे ''विश्वगुरू'' ह्या सन्माननीय पदवीने सन्मानित करण्यात आले व जनसेवा क्षेत्रात 'श्रेष्ठ अग्रणी' म्हणून त्यांचा गौरव करण्यात आला.**

।।श्री काशीविश्वनाथो विजयते।।

सर्वतन्त्रस्वतन्त्र-शास्त्रार्थविद्यावतार-विश्वविश्रुत-महामहोपाध्यायदिविरुदविभूषक
पण्डितसम्राट-प्रातःस्मरणीय श्री शिवकुमारशास्त्रिमिश्रप्रतिष्ठापिता
वाराणसेयसर्वविधविद्वत्समाज-प्रतिनिधिभूता-

# श्री काशीविद्वत्परिषद्


पत्राचार कार्यालय :
डी.१७/५८, दशाश्वमेध,
वाराणसी, उत्तर प्रदेश
मो. नं. ९४१५ २८५८५६
टे. नं. ०५४२-२४५२११३


---

दिनांक 1.3.04

श्री काशीविद्वत्परिषद् समय-समय पर धर्म की समीक्षा करती आयी है । धर्म के सम्बन्ध में यह समाज को निर्देश देने का अधिकार रखती है । धार्मिक प्रकरणों में यह भारत की बहुमान्य सर्वोच्च संस्था है । किसी निर्णय को संशोधित करने का अधिकार परिषद् की कार्यकारिणी को है किन्तु धर्म और धर्मशास्त्र अपरिवर्तनशील होने से आदिकाल से धर्मशास्त्र श्रीमद्‌भगवद्‌गीता ही रही है ।

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ।। गीता, ४/१

अर्जुन ! इस अविनाशी योग को कल्प के आदि में मैंने सर्वप्रथम सूर्य के प्रति कहा । सूर्य ने अपने पुत्र मनु से कहा । मनु ने इस स्मृत ज्ञान को सुरक्षित रखने के लिए स्मृति की परम्परा चलायी और अपने पुत्र इक्ष्वाकु से कहा । कालान्तर में इस स्मृति ज्ञान को महर्षि वेदव्यास ने लिपिबद्ध किया । मानव जीवन का नियमन तथा निःश्रेयस प्रदान करने वाली आदि मनुस्मृति गीता ही है ।

मनु के समक्ष अवतरित वेद इसी का विस्तार हैं । अन्य शास्त्र समयानुसार विश्व की विविध भाषाओं में ईश्वरीय गायन श्रीमद्‌भगवद्‌गीता की ही प्रतिध्वनि हैं । गीता की अवधारणा को स्वामी अड़गड़ानन्द जी ने 'यथार्थ गीता' में व्यक्त किया है जो शत-प्रतिशत सत्य है । परा विद्या की परिभाषा है ।

स्वामी जी ने गीता की यह व्याख्या देकर विश्व मानव को एक धर्मशास्त्र, एक परमात्मा के पथ को प्रशस्त किया है । धर्मशास्त्र की व्याख्या के रूप में हम सभी 'यथार्थ गीता' की अनुशंसा करते हैं ।

गणेशदत्त शास्त्री
मंत्री
श्री काशीविद्वत्परिषद्
भारत

आचार्य केदारनाथ त्रिपाठी दर्शनरत्नम वाचस्पति
अध्यक्ष
श्री काशीविद्वत्परिषद्
भारत

भारताच्या सर्वोच्च श्री काशी विद्वत् परिषदेने दिनांक ०१-०३-२००४ रोजी ''श्रीमद्‌भगवद्‌गीते'' ला धर्मशास्त्र आणि ''यथार्थ गीते'' ला परिभाषा म्हणून स्वीकृत केले आहे.

।।श्री काशीविश्वनाथो विजयते।।

सर्वतन्त्रस्वतन्त्र-शास्त्रार्थविद्यावतार-विश्वविश्रुत-महामहोपाध्यायदिविरुदविभूषक
पण्डितसम्राट-प्रातःस्मरणीय श्री शिवकुमारशास्त्रिमिश्रप्रतिष्ठापिता
वाराणसेयसर्वविधविद्वत्समाज-प्रतिनिधिभूता-

# श्री काशीविद्वत्परिषद्

पत्राचार कार्यालय :
डी.१७/५८, दशाश्वमेध,
वाराणसी, उत्तर प्रदेश
मो. नं. ९४१५ २८५८५६
टे. नं. ०५४२-२४५२११३

दिनांक 1.3.04

श्री परमहंस आश्रम, शक्तेश गढचुनार की अपनी सौभाग्यपूर्ण यात्रा का सुअवसर प्राप्त हुआ है । वहाँ के वर्तमान परमहंस स्वामी श्री अड़गड़ानन्दजी महाराज के दर्शन का स्मरणीय अवसर काशी की विद्वन्मण्डली के साथ मुझे प्राप्त हुआ । श्री परमहंस स्वामी अड़गड़ानन्दजी महाराज ब्रह्मलीन योगिराज स्वामी श्री परमानन्द परमहंस जी के शिष्य है और उनके द्वारा प्राप्त मानव धर्मोपदेश को स्वरचित 'यथार्थ गीता' के माध्यम से मानव मात्र के लिये प्रसारित कर रहे है, जिस गीता का ज्ञान भगवान कृष्ण ने अपने मुखारविन्द से अर्जुन के माध्यम से समस्त मानव के लिये किया था । इसीलिये श्रीमद्भगवद् गीता मानव मात्र का धर्मशास्त्र है । भगवान एक है और सबके है अतः उनकी गीता भी एक आकाश, एक सूर्य और एक चन्द्र के समान सबके लिये है ।

इस प्रकार गीता एकतामूलक है और स्वयं भी एकता का मूल है । भगवान ने स्वयं कहा है - ममैवांशो जीव लोकः'' अर्थात् प्राणी मात्र भगवान का ही अंश है तथा अंश अंशी में भेद नही होता है । अतः प्रत्येक प्राणी भगवद्भिन्नता के आधार पर वस्तुगत्या परस्पर में भी अभिन्न ही हैं। ''तद्भिन्नाभिन्नस्य तदभिन्नत्व नियमः'' यह वस्तुस्थिति है । अतःगीता एकतामूलक तथा एकता का मूल दोनो ही है । यही गीता की यथार्थता है जिसे पूज्य परमहंस जी महाराज ने ''यथार्थ गीता'' में, जो भाष्यरुप है, प्रतिपादित किया है ।

यहाँ ''यथार्थ गीता'' पद से यह भ्रम नहीं होना चाहिए कि कोई अयथार्थ गीता भी है क्योंकि गीता एक है - श्रीमद्भगवद् गीता'। प्रस्तुत 'यथार्थ गीता' श्रीमद्भगवद् गीता' का ही भाष्य है, जिसे स्वयं परमहंस श्री स्वामी जी महाराज ने प्रत्येक अध्याय की अंतिम पुष्पिका में कहा है ।- 'यथार्थ गीता' भाष्ये - ऐसा उल्लेख करते हुये । इसलिये 'यथार्थ गीता' का अभिप्रेतार्थ है । गीता की यथार्थता! इस अभिप्रेतार्थ को श्री स्वामी परमहंस जी ने इस सम्पूर्ण भाष्य में प्रतिपादित किया है ।

श्रीमद्भगवद् गीता पर अनेक भाष्य निर्मित हुए है - जैसे कर्म की प्रधानता बताते हुए लोकमान्य तिलक का गीता रहस्य, भगवद्भक्ति प्रधान वैष्णव भाष्य तथा ज्ञान प्रधान शांकरभाष्यादि ग्रन्थ! किन्तु प्रस्तुत यथार्थ गीता में एकेश्वरवाद मुख्यतया प्रतिपादित है जिसका किसी से विरोध नहीं है, प्रत्युत्त सबके साथ एक ईश्वरत्व की अनुभूति के रुप में सामंजस्य प्रकाशक है । क्योंकि कर्मकलाप भी उसी में पर्यवसित, भक्ति भी उसी की, तथा उसी का साक्षात्कार परमपुरुषार्थ मोक्ष का साधक है । भगवान ने स्वयं कहा है-

''यत्करोषि यद्श्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौन्तेय! तत्कुरुस्व मदर्पणम् ।।
''मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्व न संशयः ।।

तथा ''ज्ञात्वा मां शान्ति मृच्छति, ''ज्ञान लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधि गच्छति ''सर्व ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिस्यसि'' तथा सर्व कर्माखिलं पार्थ! ज्ञाने परिसमाप्यते'' इत्यादि । इस प्रकार प्रस्तुत ''यथार्थ गीता'' की यथार्थता है - एक परमतत्व परमात्मा के आधार पर सबमें समत्व की अनुभूति -

''समो ऽहं सर्वभूतेषु न में द्वेष्यो ऽस्ति न प्रियः ।

इस पवित्र उद्देश के साथ श्री परमहंस स्वामी अडगडानन्दजी महाराज द्वारा संस्थापित एवं संचालित यह परमहंस आश्रम ऋषियों के प्राचीन गुफाओं एवं अरण्यो की तरह इस पर्वत श्रेणी के बीच से लोक में गीतोक्त इस उपदेश को उद्बुद्ध करने वाला है कि शास्त्रानुमोदित स्वाभाविक व्यवहार को अपनाते हुए सबमें ''अभेदभावनयैव यतितव्यम् भाव को लोक कल्याणार्थ प्रसारित करना है ।

हरि ॐ तत्सत्

आचार्य केदारनाथ त्रिपाठी दर्शनरत्नम वाचस्पति
अध्यक्ष
श्री काशीविद्वत्परिषद्
भारत

भारताच्या सर्वोच्च श्री काशी विद्वत् परिषदेने दिनांक ०१-०३-२००४ रोजी ''श्रीमद्भगवद्गीते'' ला धर्मशास्त्र आणि ''यथार्थ गीते'' ला परिभाषा म्हणून स्वीकृत केले आहे.

## गीता म्हणजे मानवमात्राचे धर्मशास्त्र आहे.

–महर्षि वेदव्यास

श्रीकृष्णकालीन महर्षि वेदव्यासांच्या पूर्वी कोणतेही शास्त्र पुस्तकरुपाने उपलब्ध नव्हते. श्रुतज्ञानाच्या ह्या परंपरेला मोडून त्यांनी चार वेद, ब्रम्हसूत्र, महाभारत, भागवत व गीता सारख्या ग्रंथात पूर्व संचित भौतिक तसेच आध्यात्मिक ज्ञान संकलित करुन शेवटी स्वतःच निर्णय दिला की ''सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः'' सर्व वेदांचे प्राण असणाऱ्या उपानिषदांचे सार गीतेमध्ये आहे. गीतारुपी गाईचे गोपाल श्रीकृष्णाने दोहन केले व बेचैन अशांत जीवाला परत्म्याच्या दर्शनाप्रत व साधनेच्या मार्गाने शाश्वत स्थितीपर्यंत पोहचवले. महर्षी व्यासांनी आपल्या ग्रंथामधून गीतेला 'शास्त्र' अशी संज्ञा देऊन गीतेची स्तुती केली आणि सांगितले – ''गीता सुगीता कर्तव्या'' गीतेचे चांगल्या प्रकारे अध्ययन करुन ती ह्रदयात आत्मसात करण्या योग्य आहे. ती भगवान श्रीकृष्णांच्या मुखातून निःसृत झालेली वाणी असल्याने इतर शास्त्रांचा संग्रह करण्याची काय आवश्यकता ?

गीतेचा सारांश पुढील श्लोकात व्यक्त झालेला आहे.

**एकं शास्त्रं देवकीपुत्र गीतम्, एको देवो देवकीपुत्र एव ।**
**एको मंत्रस्तस्य नामानि यानि, कर्माप्यको तस्य देवस्य सेवा ।।**

अर्थात एकच असे शास्त्र आहे जे देवकीपुत्र भगवान (श्रीकृष्णाच्या) मुखातून गायले गेले आहे. प्राप्त करुन घेण्यासारखा देवकीपुत्र (श्रीकृष्ण) हा एकच देव आहे. या त्याच्या गीतात आत्मा हेच सत्य सांगितले आहे. आत्म्याशिवाय दुसरे काहीही शाश्वत नाही. या गीतेमध्ये महायोगेश्वराने कशाचा जप करायला सांगितला? ओमचा! अर्जुना, ओम अक्षय परमात्म्याचे नाव आहे. त्याचा जप कर आणि ध्यान माझे कर. कर्म एकच आहे–गीतेमध्ये वर्णन केलेल्या परमदेव, एका परमात्म्याची सेवा! त्या परमात्म्याला श्रद्धेने ह्रदयात धारण करा. सारांश सुरुवातीपासूनच गीता आपले शास्त्र आहे. भगवान श्रीकृष्णाच्या नंतर हजारो वर्षांनी ज्या

महापुरुषांनी एका ईश्वराला सत्य असल्याचे सांगितले ते गीतेचे संदेशवाहक आहेत. ईश्वराकडून लौकिक तसेच पारलौकिक सुखांची कामना, ईश्वराला घाबरणे, अन्य कोणालाही ईश्वर न समजणे (मानणे) असे तर सर्व महापुरुषांनी सांगितले, परंतु ईश्वरासाठी साधना करणे, ईश्वरापर्यंत जाण्यासाठी मधले अंतर कमी करणे या सर्व गोष्टींची क्रमबद्ध सांगोपांग चर्चा केवळ गीतेमध्ये केलेली आहे. त्यासाठी यथार्थ गीता पाहा. गीतेने सुख शांती तर प्राप्त होतेच परंतु ती अक्षय, अनामय, परमपददेखील देते आणि हे परमपद प्राप्त करावयाचे असेल तर विश्व गौरवास पात्र झालेली टीका "**यथार्थ गीता**" पाहा.

जगात सर्वत्र गीतेचा आदर केला जातो. तरीही ही गीता कोणत्याही धर्माचा किंवा संप्रदायाचा ग्रंथ बनू शकला नाही. कारण संप्रदाय कोणत्या ना कोणत्या रुढींनी जखडलेले असतात. भारतामध्ये प्रकट झालेली गीता म्हणजे विश्वातील विद्वानांचा अनमोल ठेवा आहे. आणि म्हणुनच गीतेला राष्ट्रीय ग्रंथाचा (शास्त्राचा) मान देऊन उच्च-नीच भावाने, भेदभावाने तसेच कलह परंपरेने पीडीत आसणाऱ्या विश्वातील संपूर्ण जनतेला परमशांती देण्याचा प्रयत्न करावा.

# धर्म-सिद्धान्त – एक

## १. सर्व ईश्वराची मुले–

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः।**
**मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति।।१५/७।।**

सर्व मानव ईश्वराची मुले आहेत.

## २. मानवी देहाची सार्थकता–

**किं पुनर्ब्राह्मणः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्।।९/३३।।**

सुखरहित, क्षणभंगुर परंतु दुर्लभ असे हे मानवशरीर प्राप्त झाले असता, तू माझी आराधना कर. माझे भजर कर. अर्थात भजनाचा अधिकार फक्त देहधारी मनुष्यालाच आहे.

## ३. मनुष्याच्या जाती फक्त दोन–

**द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च।**
**दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु।।१६/३।।**

मनुष्यात फक्त दोनच वर्ग किंवा प्रकार असतात– दैवी व आसुरी! ज्याच्या हृदयात दैवी गुणांचे प्राबल्य असते, ज्याच्या हृदयात दैवी संपत्ती कार्य करीत असते तो देवतास्वरूप असतो. तर ज्याच्या हृदयात आसुरी संपत्ती कार्य करीत असेल तर तो असुरस्वरूप असतो. तोच असुर होय. तिसरा कोणतीही जात अस्तित्वात नाही.

## ४. ईश्वरामुळे प्रत्येक इच्छा ( कामना ) सुलभ–

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा**
**यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते।**
**ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोक-**
**मश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान्।।९/२०।।**

माझी उपासना करून लोक स्वर्गप्राप्तीची इच्छा करतात. मी त्यांची इच्छा पूर्ण करतो. परमात्म्याची उपासना केल्याने सर्व गोष्टी सुलभतेने प्राप्त होतात.

**५. परमेश्वराला शरण जाण्याने पापांचा नाश-**

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं सन्तरिष्यसि।।४/३६।।**

सर्व पापी लोकांपेक्षाही अधिक पाप करणारा पापीसुद्धा ज्ञानरूपी नौकेच्या सहाय्याने निःसंदेह भवपार होत असतो.

**६. ज्ञान-**

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थ दर्शनम्।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा।।१३/११।।**

आत्म्याच्या अधिपत्याखाली आचरण, परमतत्त्वाच्या अर्थानुरूप माझे परमात्म्याचे प्रत्यक्ष दर्शन म्हणजे ज्ञान आहे आणि त्याच्या विपरीत जे काही आहे ते अज्ञान आहे. म्हणून ईश्वराची प्रत्यक्ष जाण किंवा ओळख म्हणजेच ज्ञान होय.

**७. उपासनेचा अधिकार सर्वांना-**

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक्।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः।।९/३०।।**
**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति।।९/३१।।**

अत्यंत दुराचारी-पापी मनुष्यदेखील भजन करून सत्वर धर्मात्मा बनू शकतो, तसेच शाश्वत परमशांती प्राप्त करू शकतो व म्हणून ज्याने स्वतःला संपूर्णपणे भगवतचरणी समर्पित केले आहे, तो धर्मात्मा होय.

**८. भगवत्मार्गात बीज नष्ट होत नाही-**

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते।**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्।।२/४०।।**

आत्मादर्शनाच्या क्रियेच्या स्वल्प आचरणानेदेखील जन्म-मरणाच्या महान भयापासून मनुष्याचा उद्धार होतो.

**९. ईश्वराचा वास-**

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।**
**भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया।।१८/६१।।**

सर्व भूतमात्रांच्या (प्राण्यांच्या) हृदयात ईश्वराचा वास असतो.

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत।**
**तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्।।१८/६२।।**

सर्व भावनाभावित होऊन त्या परमात्म्याला शरण जाल, तर त्याच्या कृपेने तुम्हाला परमशांती व शाश्वत परमधाम प्राप्त होईल.

**१०. यज्ञ-**

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते।।४/२७।।**

ज्ञानाने प्रदीप्त झालेल्या आत्मसंयमरूपी योगाग्नीत सर्व इंद्रियांची कर्मे व मनाचे सर्व विकार यांचे हवन केले जाते.

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे।**
**प्राणापानगतीरुद्ध्वा प्राणायामपरायणाः।।४/२९।।**

बरेचसे योगी श्वासाचे प्रश्वासात हवन करतात आणि दुसरे बरेचसे प्रश्वासाने श्वासात हवन करतात. यानंतर थोडी उन्नत अवस्था प्राप्त झाल्यानंतर श्वास-प्रश्वास यांच्या गतीचा निरोध करून ते प्राणायामामध्ये तल्लीन होऊन जातात. या प्रकारे योगसाधनेच्या विधी विशेषालाच यज्ञ असे म्हणतात. त्या यज्ञाला कार्यरूप देणे म्हणजे कर्म होय.

**११. यज्ञाचा अधिकार-**

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम।।४/३१।।**

जे यज्ञ करीत नाहीत त्यांना पुन्हा मनुष्यशरीर प्राप्त होत नाही व हे मनुष्यशरीर प्राप्त झालेल्या सर्वांना यज्ञ करण्याचा अधिकार आहे.

**१२. ईश्वराला पाहता येते-**

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन।**
**ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परन्तप।।११/५४।।**

अनन्य भक्तीच्या योगाने साधक मला सुलभतेने प्रत्यक्ष पाहू शकतो, मला ओळखू (जाणू) शकतो व माझ्यामध्ये प्रवेशही करू शकतो.

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेन-**
**माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति**
**श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्।।२/२९।।**

या अविनाशी आत्म्याकडे कोणी विरळाच आश्चर्य म्हणून, अद्भुत् वस्तू म्हणून, पाहतात. अर्थात हे त्याचे प्रत्यक्ष दर्शन होय.

**१३. आत्माच सत्य आहे, सनातन आहे-**

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः।।२/२४।।**

आत्माच सत्य आहे. आत्माच सनातन आहे.

**१४. विधाता व त्यापासून उत्पन्न झालेली सृष्टी नश्वर आहे-**

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते।।८/१६।।**

ब्रह्मा आणि त्याने निर्माण केलेली सृष्टी, देवता आणि दानव म्हणजे दुःखाची खाण आहे, ते सर्व क्षणभंगुर आहे, नश्वर आहे.

**१५. देवपूजा-**

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया।।७/२०।।**

कामवासनांनी ज्यांची बुद्धी विकृत झालेली आहे असे मूढ बुद्धीचे लोक परमात्म्याव्यतिरिक्त अन्य देवतांची पूजा करतात.

**येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः।**

**तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्।।९/२३।।**

अर्थात, देवतांची पूजा करणारे माझीच पूजा करीत असतात; परंतु ते पूजन अविधीपूर्वक असल्याने नष्ट होऊन जाते.

**कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः।**

**मां चैवान्तः शरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान्।।१७/६।।**

सात्त्विक श्रद्धा असणारे देवतांची पूजा करतात; परंतु असे पूजन करणाऱ्यांनाही तू असुर समज.

**१६. अधम-**

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान्।**

**क्षिपाम्यजस्त्रमशुभानासुरीष्वेव योनिषु।।१६/७-१९**

जो यज्ञाचा नियत विधी सोडून कल्पित विधींनी यज्ञाचे यजन करतो; तो क्रूर कर्मी, पापाचारी तसेच मनुष्यामध्ये अधम आहे.

१७. नियत विधि म्हणजे काय?

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन्।**

**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम्।।८/१३।।**

नियत विधी म्हणजे अक्षय ब्रह्माचा निर्देशक असणाऱ्या ॐ चा जप करणे. माझे म्हणजे परमात्म्याचे स्मरण करणे व तत्त्वदर्शी महापुराणाच्या मार्गदर्शनाखाली ध्यान करणे होय.

**१८. शास्त्र-**

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ।**

**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत।।१५/२०।।**

शास्त्र म्हणजे गीता होय.

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।**

**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि।।१६/२४।।**

कर्तव्य कोणते व अकर्तव्य कोणते हे ठरवितांना शास्त्र प्रमाण समजले जाते. तेव्हा गीतेमध्ये (शास्त्रामध्ये) जो निर्धारित विधी सांगितला आहे त्याप्रमाणे आचरण करावे.

**१९. धर्म-**

**सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।।१८/६६।।**

धार्मिक उलथा-पालथ सोडून तू फक्त मला शरण ये. अर्थात भगवंताच्या ठिकाणी संपूर्ण समर्पण हेच धर्माचे मूळ आहे. त्या दयाघन प्राभूला प्राप्त करण्याचे नियत विधीचे आचरणच धर्माचरण होय (अध्याय २ श्लोक ४०) आणि जो हे आचरण करतो तो मनुष्य अत्यंत पापी असला तरी तो शीघ्र धर्मात्मा बनतो (अध्याय ९ श्लोक ३०)

**२० ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च।**

**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च।।१४/२७।।**

त्या अविनाशी ब्रह्माचा, अमृताचा, शाश्वत धर्माचा आणि अखंड एकरस आनंदाचा आश्रय-आधार मीच आहे. अर्थात, परमात्मास्थित सद्‌गुरु हेच या सर्वांचे आश्रय आहेत- आधार आहेत.

नोट : (विश्वातील सर्व धर्मांची सत्यधारा म्हणजे गीतेची प्रसारण होय.)

## प्राचीनकाळापासून आजपर्यंतच्या विव्दानांचे तैथिक क्रमानुसार संदेश

श्री परमहंस आश्रम जगतानन्द ग्रा. पो. बरैनी कच्छवा, जिल्हा – मिर्जापूर (उ.प्र.) येथील आपल्या वास्तव्यात स्वामी अडगडानन्दजींनी प्रवेशव्दाराजवळ एका बोर्डावर गंगा दशहऱ्याच्या (१९९३ इ.) पावन पर्वप्रसंगी याची एक प्रत लावली होती.

ॐ

**।। विश्वगुरु भारत ।।**

- **वैदिक ऋषि (अनादिकाल-नारायण सूक्त)**
  कणा–कणात व्यापून राहिलेले केवळ ब्रम्हच सत्य आहे. त्याला जाणणे हाच मोक्षाचा एकमेव उपाय आहे.
- **भगवान श्रीराम (त्रेता-लाखो वर्षापूर्वी-रामायण)**
  ईश्वराच्या भजनाशिवाय कल्याणाची इच्छा करणे मूर्खपणाचे आहे.
- **योगेश्वर श्रीकृष्ण (५००० वर्षापूर्वी-गीता)**
  परमात्माच सत्य आहे. चिंतनाच्या पूर्ती काळात सनातन ब्रम्हाची प्राप्ती होत असते. देवी–देवतांची पूजा करणे मूर्खपणाचे असते.
- **महात्मा मूसा (३००० वर्ष पूर्व-यहूदी धर्म)**
  तूम्ही ईश्वरावरील श्रद्धा बाजूला सारून मूर्ती बनवलीत त्यामुळे ईश्वर नाराज आहे. तेव्हा प्रार्थनेत मन केंद्रित करा.
- **महात्मा जरथुस्त्र (२७०० वर्ष पूर्व-पारसी धर्म)**
  अहुरमज्दा म्हणजेच ईश्वराची उपासना करुन दुःखाचे कारण असणाऱ्या व हृदयात ठाणा मांडून असणाऱ्या विकारांना नष्ट करा.
- **भगवान महावीर (२६०० वर्ष पूर्व-जैन ग्रंथ)**
  आत्मा हेच सत्य आहे. कठोर तपस्या करून याच जन्मात ते सत्य जाणता येते.

- **गौतम बुद्ध ( २५०० वर्ष पूर्व-महापरिनिब्बान सुत्त )**

  मी ते अविनाशी पद प्राप्त केले आहे, जे पूर्वी महर्षींनी प्राप्त केले होते. हाच मोक्ष होय.

- **मसीह ईसा ( २००० वर्ष पूर्व-ईसाई धर्म )**

  प्रार्थनेने ईश्वर प्राप्त होत असतो. माझ्याकडे म्हणजेच सद्‌गुरुजवळ जा म्हणजे ईश्वराचे पुत्र असे तुम्हाला म्हंटले जाईल.

- **हज़रत मुहम्मद साहेब ( १४०० वर्ष पूर्व-इस्लाम धर्म )**

  "ला इल्लाह इल्लल्लाह मुहम्मदुर्र रसूल्लाह"- कणा कणात व्यापुन असलेल्या खुदाशिवाय (ईश्वराशिवाय) कोणीही पूजनीय नाही. मुहम्मद अल्लाहचे संदेशवाहक आहेत.

- **आदि शंकराचार्य ( १२०० वर्ष पूर्व )**

  हे जगत मिथ्या आहे. या जगात फक्त तो हरी व त्याचे नाव एवढेच सत्य आहे.

- **संत कबीर ( ६०० वर्ष पूर्व )**

  राम नाम अति दुर्लभ, औरन ते नहि काम । आदि मध्य औ अन्तहूं, रामहिं ते संग्राम ।। रामाबरोबर संघर्ष करा, तोच कल्याण करणारा आहे.

- **गुरु नानक ( ५०० वर्ष पूर्व )**

  "एक ओंकार सत्‌गुरु प्रसादि । एक ओंकारच सत्य आहे; परंतु तो सद्‌गुरुच्या कृपेचा प्रसाद आहे."

- **स्वामी दयानन्द सरस्वती ( २०० वर्ष पूर्व )**

  अजर, अमर, अविनाशी अशा परमात्म्याची उपासना करा. त्या ईश्वराचे मुख्य नाव ओम् आहे.

- **स्वामी श्री परमानन्दजी ( १९१२-१९६९ )**

  ईश्वर जेव्हा कृपा करतो तेव्हा शत्रु मित्र बनतो आणि आपत्ती संपत्ती बनत असते. ईश्वर सर्वत्र पाहत असतो.

।। ॐ ।।

# अनुक्रमणिका



ॐ

# प्रस्तावना

वास्तविक गीतेवर टीका लिहिण्याची खरोखर आज काहीच आवश्यकता नाही, कारण गीतेवर शेकडो भाष्ये लिहिली गेली आहेत. ज्यामध्ये पन्नास एक टीका तर केवळ संस्कृतमध्ये झालेल्या आहेत. गीतेविषयी पाच पन्नास विविध प्रकारची मते आहेत. अर्थात सर्वांचे मूळ एकच म्हणजे गीता आहे. योगेश्वर श्रीकृष्णांनी तर गीतेमध्ये एकच गोष्ट सांगितली आहे, मग असे मतभेद का? वास्तविक वक्ता एकच असतो. परंतु समोर दहा श्रोते बसलेले असतील तर ते दहा प्रकारांनी वक्त्याचा आशय ग्रहण करतील कारण मनुष्याच्या बुद्धीवर सत्त्व, रज व तम या गुणांचा जितका प्रभाव असेल, त्यानुसार तो आशय ग्रहण करत असतो. त्याच्यापुढे त्याला वेगळे असे काही आकलनच होत नाही. त्यामुळे मतमतांतर असणे स्वाभाविक आहे.

भिन्न भिन्न मतांमुळे किंवा काही वेळा एकच सिद्धांत निरनिराळया काळांत आणि भाषांमध्ये व्यक्त झाल्यामुळे सर्वसामान्य मनुष्य संशयात पडतो, अनेक भाष्यांमध्ये एकाच सत्याचा स्त्रोत वाहत आहे; परंतु शुद्ध अर्थ सांगणारे एक पुस्तक हजारो टीकांमध्ये ठेवून दिले तर नेमके यथार्थ अर्थाचे पुस्तक ओळखणे किंवा शोधून काढणे कठीण जाते. सध्या गीतेवर बरीच भाष्ये झालेली आहेत. ती सर्व त्यांना समजलेल्या सत्याचा उद्‌घोष करीत असतात. परंतु गीतेच्या शुद्ध अर्थापासून ती भाष्ये बरीच दूर आहेत. काही महापुरुषांनी तर सत्याला निश्चितपणे स्पर्श केलेला आहे. परंतु काही कारणामुळे ते समाजाच्या समोर ठेवू शकले नाहीत.

श्रीकृष्णाचा आशय आपल्या हृदयात ते साठवू शकले नाहीत कारण, मूलतः श्रीकृष्ण एक योगी होते. श्रीकृष्ण ज्या स्तरावरची गोष्ट करतात, त्या स्तरावर क्रमाक्रमाने पोहचून उभा राहणारा महापुरुष अक्षरशः असे दाखवू शकेल की, श्रीकृष्णांनी जेव्हा गीतेचा उपदेश केला त्यावेळी त्यांच्या मनात

कोणता भाव, आशय होता? मनातील सर्व भाव सांगता येत नाहीत, काही सांगितल्यानंतर जाणता येतात, काही भाव भावनांच्या द्वारा व्यक्त होतात आणि बाकीचे पूर्णपणे क्रियात्मक आचरणाचे असतात. असे भाव प्राप्त करण्याकरिता वाटसरुने मार्गक्रमण करायला हवे. ज्या स्तरावर श्रीकृष्ण होते त्या स्तरावर क्रमाक्रमाने चालत पोहचलेला महापुरुष जाणू शकतो की, गीता काय सांगत आहे? तो गीतेचे श्लोक पुन:पुन्हा म्हणत नाही; पण त्यातील भावाचे दर्शन घडवितो कारण जे दृश्य त्यावेळी श्रीकृष्णांच्या समोर होते तेच दृश्य वर्तमानकाळातील महापुरुषाच्या समोर आहे. म्हणूनच तो पाहू शकतो, दाखवून देतो, आपल्यात जागृत पण करतो व त्या पथावर मार्गक्रमण पण करवितो.

पूज्य श्री परमहंसजी महाराजदेखील त्याच स्तरावरील महापुरुष होते. त्यांच्या मुखातून व अंत:प्रेरणेतून गीतेचा जो अर्थ प्राप्त झाला, त्याचे संकलन म्हणजे ही 'यथार्थ गीता' होय. त्यात आमचे स्वत:चे काहीसुद्धा नाही. हा 'क्रियात्मक योग' आहे. साधना करणाऱ्या प्रत्येक पुरुषाला या परिस्थितीतून जावे लागते. जोपर्यंत तो याच्यापासून अलग आहे, वेगळा आहे तोपर्यंत स्पष्टच आहे की, तो कसल्या ना कसल्या प्रकारच्या बढाया मारीत असतो, डांगोरा पिटत असतो; परंतु तो साधना करु शकत नाही. म्हणून एखाद्या महापुरुषाला शरण जावे, कारण की श्रीकृष्णाने दुसरे कसलेच सत्य सांगितलेले नाही. '**ऋषिभिर्बहुधा गीतं**' ऋषिमुनींनी ज्याचे पुष्कळ वेळा गायन केले आहे तेच मी सांगणार आहे. त्यांनी असे नाही म्हंटले की, ते ज्ञान फक्त मलाच माहीत आहे, केवळ मीच ते जाणतो अथवा मीच ते दाखवू शकेन. पण त्यांनी सांगितले ''एखाद्या तत्वद्रष्ट्याकडे जा. निष्कपट-निर्मळ-शुद्ध भावाने त्याची सेवा करुन ते ज्ञान त्याच्याकडून प्राप्त करा'' श्रीकृष्णाने महापुरुषांच्या द्वारा शोधलेले, सनातन सत्यच पुन: सांगितले आहे.

गीता सुबोध अशा संस्कृतमध्ये आहे. जरी अन्वयार्थ घेतला तरी गीतेचे बहुतांशी तत्त्वज्ञान आपण स्वत:च हृदयात साठवू शकतो; पण आपण नेमका तोच अर्थ घेत नाही. उदाहरणार्थ पहा. श्रीकृष्णांनी स्पष्टपणे सांगितले की यज्ञाची प्रक्रिया म्हणजेच कर्म होय. तरीही आपण म्हणतो की

शेती करणे हे कर्म होय. यज्ञाची कल्पना स्पष्ट करतांना त्यांनी सांगितले की, यज्ञामध्ये बहुतेक योगीजन प्राणवायूचे अपान वायूमध्ये हवन करतात. तसेच बरेचसे योगी अपान वायूचे प्राणवायूत हवन करतात. तर बरेचसे योगी 'प्राण' आणि 'अपान' या दोन्ही वायूंना थांबवून प्राणायामात मग्न होऊन इंद्रियांच्या संपर्ण प्रवृत्तींना संयमरुपी अग्नीत हवन करतात. अशा प्रकारे श्वास-उच्छ्श्वासाचे चिंतन म्हणजे यज्ञ होय. मनासह इंद्रियांचा संयम म्हणजे यज्ञ आहे. शास्त्रकारांनी स्वतः यज्ञाचे स्वरुप सांगितलेले असतानाही आपण म्हणतो की विष्णूच्या नावाने स्वाहा बोलणे, अग्नीमध्ये जव, तीळ, तूप याचे हवन करणे म्हणजे यज्ञ होय. श्रीकृष्णांनी मात्र असा एक शब्दही सांगितलेला नाही.

आपण ही गोष्ट समजू शकलो नाही त्याचे काय कारण आहे बरे? शेंडी तुटेपर्यंत घोकंपट्टी करुन सुद्धा आपल्या हातात वाक्याचा निरर्थक अर्थ का पडतो? आपणाला यथार्थ ज्ञानाबद्दल काहीच का कळत नाही? वास्तविक, मनुष्य जन्म घेऊन हळूहळू मोठा होत जातो; तेव्हा वडिलोपार्जित संपत्ती (घर, दुकान, जमीन-जुमला, पद-प्रतिष्ठा, गाय, म्हैस, यंत्र, उपकरण इत्यादी) त्याला वारशात प्राप्त होते. बरोबर त्याच प्रकारे काही रुढी, परंपरा, पूजा-पद्धती या गोष्टीदेखील वारशामध्ये प्राप्त होतात. खूप पूर्वी भारतात तेहतीस कोटी देवदेवता मोजल्या जात असत. अखिल विश्वात त्यांची अगणित रुप आहेत. बालक जसजसे मोठे होत जाते तसतसे आपले आई-वडील, बहीण-भाऊ, शेजारी-पाजारी यांची पूजा पाहते. कुटुंबात चालत आलेल्या उपासना पद्धतीची कायम छाप त्याच्या डोक्यावर पडते. देवीची पूजा एखाद्या कुटुंबात चालत असेल तर जन्मभर तो त्या देवीचा जप करीत राहतो. जर कुटुंबात पिशाच्च पूजा होत असेल तर तो पिशाच्चाचा जप करीत बसतो. याप्रमाणे कोणी शिवाला तर कोणी दुसऱ्या देवाला पकडून ठेवून त्यांचा जप करतो. सारांश त्यांना तो सोडू शकत नाही.

अशा संभ्रमित झालेल्या पुरुषाला गीतेसारखे कल्याणकारी शास्त्र मिळाले तरी तो ते शास्त्र समजू शकत नाही. वडिलोपार्जित संपत्ती तो एखाद्या वेळेस सोडू शकेल; परंतु रुढी व धर्म कर्मकांडातील कर्मकठतेला तो

कधी नष्ट करु शकत नाही. वडिलोपार्जित संपत्ती सोडून आपण हजारो मैल दूर जाऊ शकतो; परंतु मनावर व बुद्धीवर बिंबलेले रुढीगत विचार तेथेही आपला पिच्छा सोडत नाहीत. आपण डोके उडवून ते बाजूला तर ठेवू शकत नाही. त्यामुळे आपण यथार्थ शास्त्राला, त्याच रूढी, रिवाज, मान्यता, आणि उपासना पद्धतींना अनुरूप अशा साच्यात ठेवून बघू इच्छितो. जर त्यानुसार गोष्ट चपखल बसली, घटनांचा क्रम बसला तर आपण त्याला बरोबर समजतो. म्हणूनच आपल्याला गीतेचे रहस्य नीट समजू शकत नाही. गीतेचे रहस्य नीट दिसत नाही. म्हणून गीतेचे रहस्य हे रहस्यच बनून राहते. हे रहस्य समजायला वास्तविक संत किंवा सद्‌गुरु आहेत. तेच गीतेचा आशय, गीतेचे म्हणणे यथार्थपणे सांगू शकतात. सर्वजण गीतेचे रहस्य समजू शकत नाहीत. तेव्हा श्रीकृष्णांनी ज्यावर भर दिला आहे तो सुलभ उपाय म्हणजे एखाद्या महापुरुषाच्या सान्निध्यात राहावे.

गीता हा ग्रंथ कोण्या विशिष्ट व्यक्ती, जात, वर्ग, पंथ, देश, काल किंवा रूढिग्रस्त संप्रदायाचा नाही. उलट हा एक सार्वलौकिक व सार्वकालीन धर्मग्रंथ आहे. तो प्रत्येक देश, जात, व सर्व स्तरावरील प्रत्येक लोकांसाठी आहे. केवळ इतरांकडून ऐकून किंवा कोणाच्या तरी प्रभावाने मनुष्याने असा एखादा निर्णय घेऊ नये की ज्याचा प्रभाव सरळ सरळ त्याच्या अस्तित्वावरच पडत असतो. पूर्वग्रहापासून मुक्त होऊन सत्यशोधकांसाठी हा ‘आर्षग्रंथ’ म्हणजे एक दीपस्तंभ आहे. हिंदूंचा आग्रह आहे की ‘वेद’ हेच प्रमाण आहेत. वेदाचा अर्थ आहे ज्ञान ! परमात्म्याचे आकलन ! ज्ञान ! परमात्मा ना संस्कृतमध्ये आहे, ना संहितेमध्ये. पुस्तक तर त्याचे एक संकेतमात्र आहे. वस्तुतः तो हृदयात जागृत होतो.

विश्वामित्र चिंतन करीत होते. त्यांची भक्ती बघून ब्रह्मदेव आले. म्हणाले, “आजपासून तुम्ही ऋषी झालात”. पण विश्वामित्रांना ब्रह्मदेवाच्या या वराने संतोष झाला नाही. पुन्हा चिंतनात मग्न झाले. काही काळानंतर देवतांसहित ब्रह्मदेव पुन्हा आले आणि म्हणाले, “तुम्ही आजपासून राजर्षी झालात”, परंतु विश्वामित्रांचे समाधान झाले नाही. ते पुन्हा निरंतर चिंतनात मग्न झाले. काही कालावधीनंतर ब्रह्मदेव दैवी संपत्तीसह पुन्हा आले आणि

म्हणाले, ‘‘आजपासून तुम्ही महर्षी झाला आहात’’ यावर विश्वामित्र म्हणाले, ‘‘नाही, मला जितेंद्रिय ब्रह्मर्षी म्हणा’’ यावर ब्रह्मदेव म्हणाले, ‘‘अजून तुम्ही जितेंद्रिय झाले नाही’’. विश्वामित्र पुन्हा ध्यानाला बसले तेव्हा त्यांच्या डोक्यातून तपस्येचा धूर निघायला लागला तेव्हा सर्व देवतांनी ब्रह्मदेवाला निवेदन केले- विनंती केली, तेव्हा ब्रह्मदेव म्हणाले, ‘‘आता तुम्ही ब्रह्मर्षी झालात’’ विश्वामित्र यावर म्हणाले, ‘‘जर मी ब्रह्मर्षी आहे तर वेद आम्हाला वरू दे’’. वेद विश्वामित्राच्या हृदयात अधिष्ठित झाले. जे तत्व माहीत नव्हते ते माहीत झाले. यालाच वेद म्हणायचे. पोथीला नाही. जेथे विश्वामित्र राहात होते तेथे वेदपण राहात होते. हेच श्रीकृष्ण पण सांगतात. ‘‘संसार अविनाशी पिंपळाचा वृक्ष आहे. वर परमात्मा ज्याचे मूळ आहे आणि खाली प्रकृतीपर्यंत त्याच्या शाखा आहेत.जो या प्रकृतीचा नाश करून परमात्म्याला समजून घेतो तो वेदवेत्ता असतो. अर्जुना मी पण वेदवेत्ता आहे. म्हणजे प्रकृतीचा प्रसार व नाश या बरोबर परमात्म्याच्या अनुभूतीलाच ‘वेद’ असे नाव आहे. हा अनुभव ईश्वराची देणगी आहे, म्हणूनच वेदाला अपौरुषेय असे म्हंटले जाते. महापुरुष अपौरुषय असतो. त्यांच्या माध्यमातून परमात्माच बोलत असतो. ते महापुरुष परमात्म्याचे संदेश प्रसारक होऊन जातात. फक्त शब्दज्ञानाच्या आधारावर त्यांच्या वाणीत नेमका अर्थ पारखता येत नाही. त्यांना फक्त असाच माणूस ओळखू शकतो, की ज्याने ‘क्रियात्मक’ साधना पथावर चालून अशी अपौरुषेय देहबुद्धी पलीकडील स्थिती प्राप्त केली आहे, ज्याचा पुरुष (मी) परमात्म्यामध्ये विलीन झालेला आहे.

खरे म्हणजे, वेद अपौरूषेय आहेत. परंतु बोलणारे शंभर दीडशे महापुरुषच होते. त्यांच्या वाणीच्या संकलनाला ‘वेद’ म्हणू लागले. परंतु ज्यावेळी शास्त्र लिहिण्यात येते तेव्हा सामाजिक व्यवस्थेचे नियमपण त्याबरोबर लिहिले जातात. महापुरुषाच्या नावावर जनता त्याचे पण पालन करू लागते, जरी धर्माबरोबर त्यांचा नाममात्र पण संबंध राहिलेला नसतो. आधुनिक काळात मंत्र्याच्या मागे-पुढे फिरून साधारण पुढारी सुद्धा, अधिकारीवर्गाकडून आपले काम करून घेतात. खरे म्हणजे मंत्रिमहोदय अशा पुढाऱ्याला ओळखत पण नाहीत. या प्रकारे सामाजिक उपयुक्तता तत्कालीनच होत असते. वेदांच्या बाबतीतही असेच आहे. त्यांचे चिरंतन

सत्य उपनिषदात ग्रंथित केलेले आहे. त्या उपनिषदांचा सारांश म्हणजे योगेश्वर श्रीकृष्णाची वाणी 'गीता' होय. थोडक्यात गीता ही अपौरुषय 'वेद' सांगरातून घुसळून काढलेल्या उपनिषदरूपी अमृताचे सार, सर्वस्व आहे.

अशा प्रकारे प्रत्येक महापुरुष की जो परमात्म्याची प्राप्ती करतो तो स्वतःच एक धर्मग्रंथ आहे. त्याच्या वाणीचे संकलन अखिल विश्वात कोठेही होऊ दे. त्याला शास्त्र म्हंटले जाते. परंतु काही काही धार्मिक मंडळीचे असे म्हणणे आहे की, ''जेवढे कुराणात उतरणार नाही'' ''ईसामसीहावर विश्वासाशिवाय स्वर्ग मिळू शकत नाही. तो ईश्वराचा एकुलता एक पुत्र होता'' ''आता असा महापुरुष होऊ शकणार नाही'' ही त्यांची रूढीप्रियता आहे. जर त्या परमतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतला तरी तीच गोष्ट पुनः होईल.

गीता सार्वभौम आहे. धर्माच्या नावावर प्रचलित विश्वातल्या सर्व ग्रंथामध्ये गीतेचे स्थान अद्वितीय आहे. गीता स्वतः धर्मशास्त्रच नाही तर इतर धर्मग्रंथात सांगितलेल्या निखळ सत्याचा मानदंड पण आहे. गीता ही एक कसोटी आहे. त्यात प्रत्येक धर्मग्रंथात सांगितलेले सत्य स्पष्टपणे समजून येते. परस्पर विरोधी विधानांबाबत समाधानकारक उकल त्यात मिळते. प्रत्येक धर्मग्रंथात, या जगातील खाण्यापिण्याविषयी सांगितले आहे. त्यात कर्मकांडाचे बाहुल्य आहे, प्राबल्य आहे. जीवनाला आकर्षक बनवण्यासाठी काय करावयाचे किंवा काय करावयाचे नाही याच्या रोचक व भयानक वर्णनांनी धर्मग्रंथ भरलेले आहेत. कर्मकांडाच्या व परंपरेला जनता धर्म समजायला लागली आहे. जीवन निर्वाहाच्या कलेसाठी निर्माण केलेल्या पूजापद्धतीमध्ये देश, काल, परिस्थितीनुसार परिवर्तन स्वाभाविकच आहे. धर्माच्या नावावर समाजातल्या कलहाचे हेच एकमात्र कारण आहे. 'गीता' हा क्षणिक, क्षणभंगुर व्यवस्थेच्या पद्धतीच्या वर उठून आत्मिक पूर्णतेत प्रतिष्ठा प्राप्त करून देणारा 'आचरणात्मक' सातत्याचा नमुना आहे. यातील एकही श्लोक भौतिक जीवनव्यवहारासाठी नाही. यातील प्रत्येक श्लोक आपल्याकडून आंतरिक संघर्षाची मनोमन आराधना, पूजनांची मागणी करीत आहे. तथाकथित धर्मग्रंथांप्रमाणे 'गीता' आपल्याला स्वर्ग किंवा नरक या द्वन्द्वात फसवत नाही. परंतु अमरत्वाची प्राप्ती करून देते की,

ज्याच्या मागे जन्म-मृत्यूचे बंधन शिल्लक राहत नाही.

प्रत्येक महापुरुषाची आपली आपली एक शैली असते व काही आपले विशिष्ट शब्द असतात. योगेश्वर श्रीकृष्णाने पण गीतेमध्ये 'कर्म', 'यज्ञ', 'वर्ण', 'वर्णसंकर', 'युद्ध', 'क्षेत्र', 'ज्ञान' इत्यादी शब्दांवर वारंवार भर दिला आहे. या शब्दांचा आपला म्हणून आशय आहे. शिवाय पुनरावृत्तीमध्ये पण त्यांचे स्वतःचे सौंदर्य आहे. हिंदी रूपांतरात या शब्दांचा त्या अर्थानेच उपयोग केला आहे. तसेच आवश्यक तेथे त्या शब्दांची व्याख्या पण दिली आहे. गीतेचे मुख्य आकर्षण म्हणजे खाली दिलेले प्रश्न आहेत. त्यांचा आशय आधुनिक समाजाने हरवलेला आहे. ते पुढील प्रकारचे आहेत 'यथार्थ गीते' मध्ये तुम्हांला ते मिळतील.

१. श्रीकृष्ण - एक योगेश्वर होते.

२. सत्य - आत्मा हेच सत्य आहे.

३. सनातन - आत्मा सनातन आहे, परमात्मा सनातन आहे.

४. सनातन धर्म - परमात्म्याला भेटवणारी क्रिया.

५. युद्ध - दैवी व आसुरी संपत्तीचा संघर्ष हेच 'युद्ध' होय. त्या अंतःकरणाच्या दोन प्रवृत्ती आहेत. त्या दोन्हींचे नष्ट होणे हाच युद्धाचा अंतिम परिणाम होय.

६. युद्ध स्थान - हे मानवशरीर आणि मनासह इंद्रियांचा समूह हे युद्धस्थळ आहे.

७. ज्ञान - परमात्म्याची प्रत्यक्ष जाणकारी म्हणजे 'ज्ञान' होय.

८. योग - या संसारातील संयोग-वियोगरहित अव्यक्त ब्रह्माशी मिलन होणे म्हणजे योग होय.

९. ज्ञानयोग - आराधना हेच कर्म आहे. स्वतःवर विश्वास ठेवून, स्वसामर्थ्यावर अवलंबून राहून कर्माला प्रवृत्त होणे हाच ज्ञानयोग होय.

१०. निष्काम कर्मयोग - 'इष्ट' म्हणजे ईश्वरावर विश्वास-श्रद्धा ठेवून समर्पणासह कर्म करण्यास प्रवृत्त होणे म्हणजे निष्काम कर्मयोग होय.

**११.** श्रीकृष्णांनी कोणते सत्य दाखवले? श्रीकृष्णांनी तेच सत्य दाखविले की जे तत्त्वदर्शी महापुरुषांनी आधीच पाहिले होते, तसेच पुढेही ते पाहणार आहेत.

**१२.** यज्ञ – साधनेच्या विशेष पद्धतीला 'यज्ञ' असे नाव आहे.

**१३.** कर्म – यज्ञाला कार्यरूप देणे म्हणजेच कर्म होय.

**१४.** वर्ण – आराधनेची एकच पद्धत की जिला कर्म म्हणतात व ज्या पद्धतीला चार श्रेणींमध्ये विभागले आहे, तेच चार वर्ण होत हे एकाच साधकाचे उच्चनीच स्तर आहेत. जाती नाहीत.

**१५.** वर्णसंकर – परमात्म्याच्या पथावरून च्यूत होणे, साधनेमध्ये भ्रम उत्पन्न होत जाणे म्हणजेच वर्णसंकर होय.

**१६.** मनुष्याची श्रेणी (वर्ग) – अंतःकरणाच्या स्वभावानुसार मनुष्य दोन प्रकारचा असतो. एक देवांसारखा व दुसरा असुरांसारखा. याच माणसाच्या दोन जाती आहेत. त्या मनुष्याच्या स्वभावाद्वारे ठरतात आणि ह्या स्वभावात चढउतार होतच असतो.

**१७.** देवता – हृदयरूपी प्रदेशात परमदेवाचे देवत्त्व मिळवून देणाऱ्या गुणांचा समूह म्हणजे देवता होय. बाह्यदेवतांची पूजा म्हणजे मूर्खपणा होय.

**१८.** अवतार – व्यक्तीच्या हृदयात होतो, बाहेर होत नाही.

**१९.** विराट दर्शन – योग्याच्या हृदयात ईश्वराकडून दिली गेलेली किंवा झालेली अनुभूती होय. परमेश्वर साधकाची दृष्टी बनून उभे राहतात; तेव्हा दिसू लागतात.

**२०.** पूजनीय देव 'इष्ट' – एकमात्र परात्पर ब्रह्म फक्त 'पूज्य' देव आहे. त्याला शोधण्याचे ठिकाण म्हणजे हृदयरूपी प्रदेशातच आहे. त्याची प्राप्ती होण्याचा स्त्रोत त्याच अव्यक्त स्वरूपात स्थिरावलेल्या सिद्ध महापुरुषांच्या द्वारा वाहत जातो.

आता यामधून योगेश्वर श्रीकृष्णाचे स्वरूप समजण्यासाठी तिसऱ्या अध्यायापर्यंत आपल्याला वाचायला हवे. तेराव्या अध्यायापर्यंत आपल्याला

स्पष्टपणे समजेल की, श्रीकृष्ण एक योगी होते. दुसऱ्या अध्यायापासून सत्य दिसायला लागेल. 'सनातन' व 'सत्य' एक दुसऱ्याचे पूरक आहेत हेही दुसऱ्या अध्यायापासूनच स्पष्ट व्हायला लागेल व तसे ते पूर्ण होईपर्यंत चालेल. अध्याय चौथ्यापर्यंत 'युद्ध' (संघर्ष) स्पष्ट व्हायला लागेल व अकराव्या अध्यायात संशयाचे निराकरण होईल. असेच अध्याय सोळाव्या पर्यंत पाहायला पाहिजे. 'युद्धक्षेत्र' समजून घेण्यासाठी तेरावा अध्याय पुनःपुन्हा पाहावा.

'ज्ञान' चवथ्या अध्यायापासून स्पष्ट होईल. तसेच तेराव्या अध्यायात ते चांगल्या प्रकारे समजायला लागेल की प्रत्यक्ष दर्शनाचे नाव 'ज्ञान' आहे. सहाव्या अध्यायापर्यंत 'योगा' चे स्वरूप आपण समजू शकाल. तसे पाहता पूर्ण होईपर्यंत योगाच्या निरनिराळ्या अंगाची परिभाषा आहे. अध्याय तीनपासून सहापर्यंत 'ज्ञानयोग' स्पष्ट होईल. पुढे पाहण्याची खास आवश्यकता नाही. 'निष्काम कर्मयोग' दुसऱ्या अध्यायापासून सुरू होऊन पूर्ण होईपर्यंत सांगितला आहे. अध्याय तिसऱ्यापासून चौथ्यापर्यंत अध्ययन केल्याने 'यज्ञा' चे स्वरूप स्पष्ट होईल.

अध्याय २/३९ मध्ये कर्माचे नाव प्रथमच उच्चारले आहे. या श्लोकापासून चौथ्या अध्यायार्पंत वाचल्यावर कर्माचा अर्थ आराधना, भजन का आहे हे स्पष्ट होईल. अध्याय सोळावा आणि सतरावा आत्माच सत्य आहे हा विचार स्थिर करतो. तिसऱ्या अध्यायात 'वर्णसंकर' म्हणजे काय ते समजते तर अध्याय चौथ्यामध्ये 'अवतार' म्हणजे काय त्याचा अर्थ स्पष्ट होतो. वर्ण व्यवस्थेसाठी अठरावा अध्याय पहावा. अर्थात तिसऱ्या-चौथ्या अध्यायात त्याचे सूचन आहे पण विस्ताराने स्पष्टता अठराव्या अध्यायातच आहे. मनुष्याच्या जाती दोन! देव आणि आसुर. त्याची स्पष्टता सोळाव्या अध्यायात आहे. दहाव्या अध्यायापासून 'विराट दर्शनास सुरुवात करून अकराव्या अध्यायापर्यंत त्याची स्पष्टता केली आहे. अध्याय सात, नऊ व पंधरामध्येपण यावर प्रकाश टाकण्यात आला आहे. अध्याय सात, नऊ व सतरामध्ये बाह्य देवतांची अस्तित्वहीनता स्पष्ट होत जाते. परमात्म्याच्या पूजेचे ठिकाण फक्त 'हृदय प्रदेशातच' आहे. त्या हृदयात ध्यान, श्वासोच्छ्वासाचे चिंतन इत्यादी क्रिया एकांतात बसून (मंदिर-मूर्तीसमोर

नाही) केल्या जातात. हे अध्याय तीन, चार, सहा आणि अठरामध्ये स्पष्ट केले आहे. जरी अध्याय सहापर्यंत गीतेचे अध्ययन केले तरी 'यथार्थ गीता'चा मूळ आशय आपल्या लक्षात येईल. त्यासाठी जास्त विचार करण्याची आवश्यकता नाही.

गीता जीवनसंग्रामाचे साधन नाही, परंतु जीवन संघर्षामध्ये शाश्वत विजय मिळविण्याचे एक सक्रिय प्रशिक्षण आहे. म्हणून तो एक युद्ध ग्रंथ आहे की तो खराखुरा विजय मिळवून देतो. परंतु गीतेमध्ये सांगितलेले युद्ध तलवार, धनुष्य बाण, गदा किंवा फरशीने लढले जाणारे लौकिक, सांसारिक युद्ध नाही. तसेच या युद्धात शाश्वत विजयसुद्धा मिळत नाही. हा तर सत् असत् प्रवृत्तींचा संघर्ष आहे. त्याच्या रूपकात्मक वर्णनाची परंपरा चालत आलेली आहे. वेदामध्ये इंद्र, वृत्त, विद्या व अविद्या, पुराणात देव व आसुर यांचा संग्राम, महाकाव्यात राम व रावण, कौरव व पांडवांच्या संघर्षालाच गीतेमध्ये धर्मक्षेत्र आणि कुरुक्षेत्र, दैवी व आसुरी संपत्ती, सजातीय तसेच विजातीय, सद्गुण आणि दुर्गुणांचा संघर्ष असे संबोधले आहे.

हा संघर्ष जेथे होतो ते ठिकाण आहे कोठे? गीतेचे धर्मक्षेत्र व कुरुक्षेत्र म्हणजे भारतातील कोणता भूभाग नाही तर स्वतः गीताकारांच्या शब्दात "इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते" कौन्तेय, हे शरीर हेच एक क्षेत्र आहे जेथे पेरलेले चांगले आणि वाईट 'बी' संस्कार घेऊन सदा उगवत असते. दहा इंद्रिये, मन, बुद्धी, चित्त, अहंकार, पाच विकार व तीन गुणांचा विकार हा या क्षेत्राचा विस्तार आहे. प्रकृतीतून निर्माण झालेल्या या तिन्ही गुणांनी विवश होऊन मनुष्याला कर्म करावेच लागते. तो एक क्षणभरही कर्माशिवाय राहू शकत नाही. "पुनरपि जननम पुनरपि मरणम पुनरपि जननी जठरे शयनम" जन्मोजन्मी तो हे करत आला आहे. हेच कुरुक्षेत्र आहे. सदगुणांच्या माध्यमातून साधनेचा नेमका मार्ग पकडून जेव्हा साधक परमधर्म परमात्म्याकडे पुढे जात अग्रेसर होतो, तेव्हा हेच क्षेत्र धर्म बनते. हे शरीरच क्षेत्र आहे.

याच शरीराच्या अंतरंगात अंतःकरणाच्या दोन प्रवृत्ती अत्यंत पुरातन आहेत. एक दैवी संपत्ती व दुसरी आसुरी संपत्ती! दैवी संपत्तीची उदाहरणे पुण्यरूपी पांडू आणि कर्तव्यरूपातली कुन्ती! पुण्य जागृत होण्यापूर्वी मनुष्य

जे काही कर्तव्य समजून करतो तो आपल्या समजुतीनुसार तो कर्तव्यच करतो. परंतु त्याच्याकडून कर्तव्य होत नाही. कारण पुण्याशिवाय कर्तव्याला समजून घेताच येत नाही. कुन्तीने पांडूशी संबंध येण्यापूर्वी जे काही मिळवले होते तो होता कर्ण! तो जन्मभर कुंतीच्या मुलांशी लढत राहिला. पांडवांचा कट्टर शत्रू जर कोणी होता, तर तो होता कर्ण! विजातीय कर्म म्हणजेच 'कर्ण' होय. जो बंधनकारक आहे, ज्याच्यामध्ये परंपरागत रूढींचे चित्रण आहे– पूजा पद्धती शरीराला सोडत नाही. पुण्य जागे झाल्यावर धर्मरूपी युधिष्ठिर, अनुरागरूपी 'अर्जुन', भावरूपी 'भीम', नियमरूपी 'नकुल', सत्संगरूपी 'सहदेव', सात्त्विकतारूपी 'सात्यकी' शरीरसामर्थ्यरूपी 'काशीराज', कर्तव्य पालनाने भवसागरावर विजय रूपी 'कुन्तीभोज' इत्यादी इष्टोन्मुख मानसिक प्रवृत्तींचा उत्कर्ष होतो. त्यांची संख्या सात अक्षौहिणी आहे. 'अक्ष' दृष्टीला म्हणतात. सत्यमय दृष्टिकोणाने जी एकत्र केली आहे ती दैवी संपत्ती! परमधर्म परमात्म्याकडे मोठे अंतर पार पाडण्यासाठी सात शिड्या म्हणजे सात भूमिका आहेत. केवळ एक संख्याविशेष नाही. खरे पाहता या प्रावृत्ती अनंत आहेत, अगणित आहेत.

दुसऱ्या बाजूला आहे 'कुरूक्षेत्र'! ज्यामध्ये दहा इंद्रिये व मन अशी अकरा अक्षौहिणी सेना आहे. मनासह इंद्रियांच्या आधीन दृष्टिकोनामुळे जी एकत्र केली गेलेली आहे ती आहे आसुरी संपत्ती! त्यातच अज्ञानरूपी धृतराष्ट्र आहे, जो सत्य जाणूनसुद्धा आंधळा बनला आहे. त्याची पत्नी आहे 'गांधारी!' गांधारी म्हणजेच इंद्रियांना आधार देणारी प्रवृत्ती! त्याबरोबर आहे मोहरूपी दुर्योधन, दुर्बुद्धी–रूपी दुःशासन, विजातीय कर्मरूपी कर्ण, भ्रमरूपी भीष्म, द्वैताचे आचारणरूपात कृपाचार्य व या सर्वांमध्ये जीवरूपी विदूर आहे जो राहतो अज्ञानात पण त्याची दृष्टी सदैव पांडवांवर आहे, पुण्याने प्रभावित झालेल्या सत्प्रवृत्तीवर आहे. कारण आत्मा परमात्म्याचा शुद्ध अंश आहे. अशा प्रकारे आसुरी संपत्ती पण अनंत आहे. क्षेत्र मात्र एकच आहे ते म्हणजे, हे शरीर. यात लढणाऱ्या दोन प्रवृत्ती आहेत त्या म्हणजे एक वृत्ती प्रकृतीवर विश्वास देववविते, नीच अधम योनीचे कारण बनते, तर दुसरी वृत्ती परमपुरुष परमात्म्यामध्ये विश्वास व प्रवेश मिळवून देते. तत्त्वदर्शी

महापुरुषांच्या मार्गदर्शनाखाली व संरक्षणाखाली क्रमाक्रमाने साधना केल्यावर दैवी संपत्तीचा उत्कर्ष व आसुरी संपत्तीचा सर्वथा नाश होतो. जेव्हा कोणता विकारच उरत नाही तेव्हा मनाचा संपूर्ण निरोध होतो व अशा स्तब्ध स्थिर मनाचा पण लय होत जातो. तेव्हा दैवी संपत्तीची आवश्यकता समाप्त होते. (उरत नाही). अर्जुनाने पाहिले की, कौरव पक्षाबरोबर पांडव पक्षाचे योद्धे पण योगेश्वरात सामावले जात आहेत. पूर्ततेबरोबर दैवी संपत्तीचा पण विलय होऊन जातो व अंतिम शाश्वत परिणाम दिसू लागतो. नंतर महापुरुष जर काही करत असेल तर ते फक्त अनुयायांच्या मार्गदर्शनासाठी करतात.

लोकसंग्रहाच्या या भावनेने महापुरुषांनी सूक्ष्म मनोभावांचे वर्णन त्यांना ठोस स्वरूप देऊन केले आहे. गीता छंदोबद्ध आहे, व्याकरणयुक्त आहे. परंतु गीतेतील पात्रे प्रतिकात्मक आहेत. अमूर्त योग्यतांची, आदर्शांची ती मूर्तरूपे आहेत. गीतेच्या प्रारंभीच तीस चाळीस पात्रांची नावे घेतली आहेत, ज्यामध्ये अर्धे स्वजातीय व अर्धे विजातीय आहेत. कोणी पांडव पक्षाचे तर कोणी कौरव पक्षाचे आहेत. 'विश्वरूप दर्शन' करवताना त्यामधील चार सहा नावे पुन: आली आहेत. त्यापेक्षा संपूर्ण गीतेमध्ये या नावांविषयी चर्चासुद्धा नाही. एकच अर्जुन असा आहे की सुरुवातीपासून शेवटपर्यंत योगेश्वरांच्या समोर आहे. तो अर्जुन पण केवळ योग्यतेचे प्रतीक आहे. काही व्यक्तिविशेष नव्हे. गीतेच्या सुरुवातीला अर्जुन सनातन कुलधर्मासाठी व्यथित आहे परंतु योगेश्वर श्रीकृष्णाने तो अज्ञानी असल्याचे दाखविले आहे. आणि त्याला उपदेश केला आहे की, आत्माच सनातन आहे, शरीर नाशवंत आहे. त्यासाठी युद्ध कर. या आदेशात असे स्पष्ट होत नाही की, अर्जुनाने कौरवांना मारावे. पांडव पक्षाचे लोकही शरीरधारीच होते. दोन्ही बाजूला नातेवाईक होते. संस्कारानुसार घडलेले शरीर तलवारीने कापल्यावर नाश पावू शकतो का? जर शरीर नाशवंत आहे तर शरीरालाच अस्तित्व नाही. तर मग तो अर्जुन तरी कोण होता? श्रीकृष्ण कोणाच्या रक्षणासाठी उभे होते? कोण्या शरीरधाऱ्याच्या रक्षणासाठी ते कटिबद्ध होते? यावर श्रीकृष्ण म्हणाले "जो शरीरासाठी परिश्रम करतो तो पापी जीव, मुर्खबुद्धी पुरुष जीवनात व्यर्थ होऊन जातो. जर श्रीकृष्ण कोण्या शरीर धारण करणाऱ्याच्या रक्षणासाठी उभे आहेत तर ते देखील मूर्ख बुद्धीचे असून ते व्यर्थ जगत आहेत. खरे पाहता अनुराग, प्रेम, हाच अर्जुन होय.

अशा प्रेमळ जनांच्या रक्षणासाठी महापुरुष सदैव उभे आहेत. अर्जुन शिष्य होता व श्रीकृष्ण सद्‌गुरु होते. नतमस्तक होऊन विनयाने त्यांने सांगितले होते की, धर्माच्या मार्गात मोहाने ग्रासलेल्या चित्ताने मी आपल्याला विचारतो आहे की जे श्रेयस्कर (परम कल्याणकारक) असेल तो उपदेश मला करावा. अर्जुन 'श्रेया'ची मागणी करीत होता. 'प्रेय' (भौतिक पदार्थ) नाही. केवळ सांगून नका तर माझ्याकडून करवून घ्या, संभाळून घ्या. मी आपला शिष्य आहे. मी आपल्याला शरण आलो आहे. अशा प्रकारे गीतेमध्ये ठिकठिकाणी हे स्पष्ट आहे की अर्जुन आर्त अधिकारी आहे व योगेश्वर श्रीकृष्ण सद्‌गुरु आहेत. ते सद्‌गुरु 'प्रेमी भक्तांच्या बरोबर सदैव राहतात व त्यांना मार्गदर्शन करतात.

जेव्हा भावनावश होऊन एखादी भावुक व्यक्ती पूज्य महाराजजींच्या जवळ राहण्यासाठी हट्ट करते तेव्हा ते सांगत असत, 'जा शरीराने कोठेही राहा, मनाने माझ्याजवळ येत राहा. सकाळ संध्याकाळ राम, शिव किंवा ॐ यांपैकी कोणत्याही दोन अडीच अक्षरांच्या नामाचा जप करा आणि माझ्या स्वरूपाचे हृदयात ध्यान करा. एक मिनीट देखील माझ्या स्वरूपाला पकडू शकलात तर ज्याचे नामस्मरण, भजन करता आहात तोच मी तुम्हाला देईन. त्याला अधिकाधिक पकडू शकलात तर हृदयापासून सारथी बनून सदैव तुमच्या बरोबर राहीन'. जेव्हा शरीर ताब्यात येते तेव्हा व त्यानंतर महापुरुष एवढ्या आपल्याजवळ राहतो की जेवढे आपले हात-पाय नाक इत्यादी अवयव आपल्याजवळ आहेत. तुम्ही हजारो किलोमीटर दूर असलात तरी ते तुमच्याजवळ आहेत. मनात विचार यायच्या आधीच त्यांचे मार्गदर्शन व्हायला लागते. अनुरागी भक्तांच्या हृदयात तो महापुरुष सदैव आत्म्याशी अभिन्न होऊनच जागृत राहतो.

गीतेच्या अकराव्या अध्यायात योगेश्वर श्रीकृष्णांचे ऐश्वर्य पाहिल्यावर अर्जुन आपल्या क्षुद्र त्रुटींसाठी क्षमायाचना करू लागला. श्रीकृष्णांनी क्षमा केली, कारण अर्जुनाच्या याचनेमुळे सौम्यस्वरूपात येऊन ते म्हणाले, "अर्जुना, माझ्या या स्वरूपाला यापूर्वी कोणी पाहिलेले नाही किंवा भविष्यातही कोणी पाहू शकणार नाही". असे जर आहे तर मग आम्हा सर्वसामान्यासाठी

गीता व्यर्थ आहे, की त्या परमात्म्याच्या दर्शनासाठी लागणारी योग्यता अर्जुनापुरतीच सीमित होती. तथापि त्यावेळी संजयही अर्जुनाबरोबर विराट दर्शन पाहात होता. तथापि श्रीकृष्णांनी सांगितले आहे की, बरेचसे योगीजन ज्ञानरूपी तपाने पवित्र होऊन साक्षात माझ्या स्वरूपाला प्राप्त करू शकले आहेत. शेवटी हे महापुरुष काय सांगू इच्छितात? वस्तुतः अनुराग– प्रेमच अर्जुन आहे. ती आपल्या हृदयातील विशेष भावना आहे. अनुरागाशिवायचा पुरुष पूर्वी केव्हाही पाहू शकला नाही. तसेच प्रेमळ भाव नसणारा पुरुष भविष्यात पण काही पाहू शकणार नाही. ''**मिलहि न रघुपति बिनु अनुरागा। किये कोटि जप योग विरागा।**'' म्हणजे अर्जुन एक प्रतीक आहे. जर प्रतीक नाही असे वाटत असेल तर गीतेचे अध्ययन सोडून द्या. तेव्हा तर या दर्शनासाठी योग्यता अर्जुनापुरती सीमित होती.

अध्यायाच्या शेवटी योगेश्वर निर्णय देत आहेत, "अर्जुना, अनन्य भक्ती आणि श्रद्धा यांच्याद्वारे मी या प्रकारे प्रत्यक्ष दर्शनासाठी (जसे तू पाहिलेस), तत्त्वाने स्पष्ट समजण्यासाठी व माझ्या अंतरंगात प्रवेश सुलभ आहे" अनन्य भक्ती अनुरागानेच दुसरे रूप आहे. आणि हेच अर्जुनाचेही स्वरूप आहे. अर्जुन पथिकाचे प्रतीक आहे या प्रकारे गीतेतील सर्व पात्र प्रतिकात्मक आहेत. ज्या त्या ठिकाणी गीतेत त्याचा संकेत मिळत असतो.

कोणी ऐतिहासिक कृष्ण किंवा अर्जुन भलेही होऊन गेलेले असोत, किंवा भले विश्वयुद्ध झालेले असो, पण गीतेमध्ये भौतिक युद्धाचे चित्रण कुठेही केलेले नाही. त्या ऐतिहासिक महायुद्धप्रसंगी घाबरला होता तो अर्जुन! सैन्य नव्हे. सैन्य तर लढण्यासाठी सज्ज होऊन उभे होते. गीतेचा उपदेश देऊन श्रीकृष्णाने काय सव्यसाची अर्जुनाला सेनेच्या योग्यतेचा केला? वस्तुतः साधन लिखाणात येत नाही. सर्व काही वाचल्यानंतरही चालत राहणे हे बाकी राहतेच. ही प्रेरणा म्हणजेच 'यथार्थ गीता' होय.

(श्री गुरुपोर्णिमा, वि.सं. २०४०) सद्गुरु कृपाश्रयी, जगतबंधु

२४ जुलै, १९८३ ई. **स्वामी अड़गड़ानन्द**

●

